**कंपनी कायदा, २०१३ मधील सेक्शन ८ अंतर्गत Centre for Health, Applied Knowledge & Research Autonomy (CHAKRA) या कंपनीचे प्रथम संचालक मंडळ निश्चीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र. क्र. ४१७/२३/शिक्षण-१**
नवीन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल,
नववा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: २८.०३.२०२५

वाचा - **१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/ प्र. क्र. ४१७/२३/शिक्षण-१, दि. १२.१०.२०२३**

**२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/ प्र. क्र. ४१७/२३/शिक्षण-१, दि.०९.१०.२०२४**

**प्रस्तावना -**

राज्यातील आरोग्य सेवा क्षेत्रात सर्वांगीण सुधारणा करण्यासाठी उत्कृष्टता केंद्रे (Centers of Excellence) स्थापन करण्याच्या संदर्भातील धोरणास दि.१२.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदर उत्कृष्टता केंद्रे स्थापन करण्यासाठी कंपनी कायदा, २०१३ मधील सेक्शन-८ अंतर्गत कंपनी स्थापन करण्यास दि.०४.१०.२०२४ रोजी मा.मंत्रीमंडळाने मान्यता दिली आहे. अनुषंगिक शासन निर्णय दि.०९.१०.२०२४ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. सदर प्रकरणी आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई यांनी उत्कृष्टता केंद्र कार्यान्वित करण्याच्या अनुषंगाने कंपनी कायदा, २०१३ मधील सेक्शन ८ अंतर्गत Centre for Health, Applied Knowledge & Research Autonomy (CHAKRA) या कंपनीची स्थापना करण्यासाठी Memorandum of Association (MoA) आणि Articles of Association (AoA) चे मसुदे सादर केले आहेत.

२. यास्तव राज्यातील शासकीय वैद्यकीय, दंत, आयुर्वेदिक तसेच होमिओपॅथी महाविद्यालयांना वैद्यकीय शिक्षण, संशोधन व रुग्णोपचारासाठी जागतिक दर्जाच्या संस्थांमध्ये रुपांतरीत करून राज्यातील आरोग्य सेवेची गुणवत्ता सुधारण्यासाठी कंपनी कायदा, २०१३ मधील सेक्शन ८ अंतर्गत Centre for Health, Applied Knowledge & Research Autonomy (CHAKRA) या कंपनीचे प्रथम संचालक मंडळ निश्चीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राज्यातील आरोग्य सेवा क्षेत्रात सर्वांगीण सुधारणा करण्यासाठी व उत्कृष्टता केंद्रांच्या कार्यान्वयनासाठी कंपनी कायदा, २०१३ मधील सेक्शन ८ अंतर्गत Centre for Health, Applied Knowledge & Research Autonomy (CHAKRA) या कंपनीचे प्रथम संचालक मंडळ पुढील प्रमाणे निश्चीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| क्र. | नाव | कंपनीतील पद |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई | संचालक |
| ३ | कुलगुरु, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक | संचालक |
| ४ | संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई | संचालक |

2. "चक्र" या सेक्शन ८ कंपनीच्या प्रथम संचालक मंडळामार्फत पुढील कार्य पार पाडण्यात येतील -

१) कंपनीची नोंदणी (Registration of Company) - "चक्र" या सेक्शन ८ कंपनीची नोंदणी करणे.

२) कंपनीसाठी नियमावली तयार करणे. (Setting initial Bylaws)- कंपनीच्या प्रशासनासाठी आवश्यक नियम / उपनियम तयार करणे व मंजूरी देणे.

३) कंपनीसाठी इतर संचालक, मुख्य कार्यकारी अधिकारी व सदस्यांची नियुक्ती व नेमणुक करणे. तसेच विषय तज्ज्ञ / वित्तीय सल्लगार / विधि अधिकारी / प्रशासकीय अधिकारी व आवश्यकतेनुसार इतर संबंधित अधिकाऱ्यांची नियुक्ती करणे

४) कंपनी कार्यान्वित करण्याकरिता बँक खाते उघडणे.

५) संस्थेचे ध्येय, दृष्टीकोन तसेच दीर्घकालिन उद्दिष्टे साध्य करण्याकरिता कंपनीस आवश्यक दिशा देणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१७२१४९२६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAWAR TUSHAR PITAMBAR

Digitally signed by PAWAR TUSHAR PITAMBAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0e7c2b89250ac281fa15181edd75966aecf408d653025 9d654b6605cd5fc363d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B620EC181468E9AE13715CE8039879786D8786 251F299A0EBE5B1878CD6E05C, cn=PAWAR TUSHAR PITAMBAR
Date: 2025.03.28 17:22:31 +05'30'

**(तुषार पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.

४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
९. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई.
१४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१५. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
१६. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१७. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ / २ महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१९. जिल्हा कोषागार अधिकारी (संबंधित)
२०. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये.
२१. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. कार्यासन शिक्षण -२, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती (शिक्षण-१).